खरीप हंगाम २०१६-१७ मध्ये राज्यशासनाने बाज़ार हस्तक्षेप योजनेत खरेदी केलेली अख्खी तूर आणि तूरडाळ खुल्या निविदेद्वारे नाफेडने स्वीकारलेल्या सूत्रानुसार विक्री करण्याचा निर्णय घेण्याकरिता समिती गठीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक: सपस-२०१८/प्र.क्र.१६९/२४- स**

मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२

दिनांक:- **१९** जून, २०१८.

<u>संदर्भ</u> :-(१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक:- सपस-२०१७/ प्र.क्र.७७/२४-स, दिनांक **२७.०४.२०१७, १६.०५.२०१७ व २६.०५.२०१७.**

(२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग क्रमांक:- सपस-२०१७/प्र.क्र.१९८/२४-स, दिनांक २५.१०.२०१७.

(३) दिनांक २९/५/२०१८ रोजीच्या राज्य मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णय

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्यात हंगाम २०१६-१७ मध्ये तूरीचे मोठ्या प्रमाणात झालेले उत्पादन परिणामी तुरीची बाजारातील आवक वाढून, तुरीसाठी निश्चित केलेल्या किमान आधारभुत किंमतीपेक्षा, कमी बाजारभाव शेतकऱ्यांना मिळत असल्याने, केंद्र व राज्य शासनामार्फत वेगवेगळया योजनांतर्गत तुरीची हमी भावाने खरेदी करण्यात आली आहे.

राज्यशासनाने स्वत:च्या निधीतून बाजार हस्तक्षेप योजनेंतर्गत २५.२५ लाख क्विंटल तुर खरेदी केली आहे. या तुरीची भरडाई करण्यास संदर्भाधिन क्र. २ येथील शासन निर्णयानुसार परवानगी देण्यात आली आहे. तथापि, तूरीची भरडाई करुन तुरडाळीची विक्री करण्यास पुष्कळ कालावधी लागणार आहे. तूर खरेदी करुन १ वर्षाचा कालावधी झाला आहे. त्यामुळे या तूरीच्या विक्रीची तातडीने कार्यवाही करणे आवश्यक आहे. त्यामुळे अख्खी तूर व तूरडाळ खुल्या निविदेद्वारे प्राप्त दराने विक्री करण्याचा निर्णय घेण्याकरिता समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या संदर्भात मंत्रिमंडळातील बैठकीतील चर्चा व निर्देश लक्षात घेऊन खरिप हंगाम २०१६-१७ मध्ये उत्पादित व राज्यशासनाच्या बाज़ार हस्तक्षेप योजनेत खरेदी केलेली अख्खी तूर आणि तूरडाळ खुल्या निविदेद्वारे विक्री करण्याचे दर इत्यादीबाबत निर्णय घेण्याकरिता नाफेडने स्वीकारलेल्या सूत्रानुसार अख्खी तूर व तूरडाळ विक्री करण्याचा निर्णय घेण्याकरिता खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई - अध्यक्ष
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कापूस उत्पादक पणन महासंघ, मुंबई - सदस्य
३) नाफेडचे प्रतिनिधी - सदस्य
४) उप सचिव (वित्त) - सदस्य
५) उप सचिव (अन्न व नागरी पुरवठा) - सदस्य
६) उप सचिव (पणन) - सदस्य

७) मुख्य वित्त अधिकारी, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,मुंबई - सदस्य
८) सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,मुंबई - सदस्य सचिव

**२.** सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं-३६९/२०१८ /व्यय २, दि.१९.०६.२०१८ याव्दारे दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१९१८१८३३६००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Ghadyale Sunanda Mohanrao

Digitally signed by Ghadyale Sunanda Mohanrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing and Textiles, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd89208cbc27b202c96467165ac5bc9643515d80ba9ed ecaf650dad6e8311b45, cn=Ghadyale Sunanda Mohanrao
Date: 2018.06.19 18:17:55 +05'30'

**(सुनंदा मो. घड्याळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण) मंत्रालय, मुंबई
५. मा. सर्व मंत्री व राज्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे मंत्रालय, मुंबई
७. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा.अ.मु.स. ( वित्त ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई,
११. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ.पुणे
१२. सर्व जिल्हाधिकारी,
१३. सर्व जिल्हा पणन अधिकारी, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.
१४. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१५. कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
१६. शाखा व्यवस्थापक, नाफेड, मुंबई
१७. महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१९. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
२०. अवर सचिव, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१. निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.